**पंचायत महिला शक्ती अभियानांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या महिला लोकप्रतिनिधींच्या कार्यकारिणीच्या संघास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पंमशअ २०१४/प्र.क्र. ५२/पंरा-१**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक: ५ सप्टेंबर, २०१४

**वाचा -**

**१) शासन निर्णय क्रमांकः पंमशअ २०१२/प्र.क्र. ७३/पंरा-१, दिनांक ६ नोव्हेंबर, २०१२**

**प्रस्तावना -**

"पंचायत महिला शक्ती अभियान" अंतर्गत दिनांक ६ नोव्हेंबर, २०१२ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयाद्वारे १८ महिला लोकप्रतिनिधींच्या कार्यकारिणी संघाची स्थापना करण्यात आली होती. सदर कार्यकारिणीचा कालावधी हा २ वर्षाचा असून त्याची मुदत १० सप्टेंबर, २०१४ रोजी संपत आहे. पंचायत महिला शक्ती अभियान अंतर्गत लोकनियुक्त पंचायत राज संस्थांमधील १८ महिला लोकप्रतिनिधीच्या कार्यकारिणीच्या संघाची शासन निर्णय दिनांक २९ एप्रिल, २०१० च्या धोरणानुसार व दिनांक ६ नोव्हेंबर, २०१२ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सुचनांनुसार दर २ वर्षांनी निवड होणे आवश्यक आहे. तथापि सदर निवड प्रक्रियेच्या काळात विधानसभा निवडणूकांची आचारसंहिता लागण्याची शक्यता असल्याने "पंचायत महिला शक्ती अभियान" अंतर्गत लोकनियुक्त १८ महिला लोकप्रतिनिधी कार्यकारिणी संघाच्या कालावधीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

"पंचायत महिला शक्ती अभियान" अंतर्गत यशदा पुणे येथे दिनांक १० व ११ सप्टेंबर, २०१२ रोजी कार्यकारिणीची निवड करण्यासाठी कार्यशाळा आयोजित करण्यात येऊन निवडणूकीद्वारे निवडण्यात आलेल्या व दिनांक ६ नोव्हेंबर, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आलेल्या १८ महिला लोकप्रतिनिधींच्या कार्यकारिणी संघाची मुदत १० सप्टेंबर, २०१४ रोजी संपत आहे. शासन आता संदर्भाधिन निर्णयाद्वारे घोषित करण्यात आलेल्या कार्यकारिणीस दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्याचा

निर्णय घेत आहे. तसेच सदर शासन निर्णयाद्वारे घोषित केलेल्या पंचायत महिला शक्ती अभियानांतर्गत महिला लोकप्रतिनिधींच्या संघातील आणि कार्यकारिणीतील रिक्त झालेली पदे तसेच भविष्यात रिक्त होणारी पदे संदर्भाधिन शासनर्णयातील मार्गदर्शक तत्वानुसार तात्काळ भरण्याची कार्यवाही करण्याचे आदेश या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१५५४४७०१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gite Naresh Bhagwanrao

Digitally signed by Gite Naresh Bhagwanrao
DN: CN = Gite Naresh Bhagwanrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.05 16:30:20 +05'30'

**(डॉ. नरेश गिते)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
४) मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
५) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
६) विभागीय आयुक्त (सर्व).
७) महासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, बाणेर रोड, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
९) पंचायत महिला शक्ती अभियान अंतर्गत लोक नियुक्त महिला संघातील संबंधित सर्व सदस्या (प्रत्येक जिल्हयातील तीन सदस्या) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या मार्फत
१०) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.